# महाराष्ट्र शासन

**न्यायालयीन प्रकरण** /अतितात्काळ

क्रमांक : एसयुटी-२०१९/प्र.क्र.१०७/१९/आ(वर्ग-२)

E-Mail:doesttclass2.wrd@maharashtra.gov.in

दूरध्वनी क्रमांक : ०२२-२२०२९१२३

जलसंपदा विभाग,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मुख्य इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- १२ मार्च, २०२०.

**प्रति,**

आयुक्त, मृद व जलसंधारण (म.रा.), वाल्मी, औरंगाबाद.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
सर्व कार्यकारी अभियंता (जिल्हा परिषद), लघु पाटबंधारे विभाग,

**विषय:-** मूळ अर्ज क्र. २१७/२०१९.
श्री. बाळासाहेब कारभारी आव्हाड व इतर
विरुध्द
महाराष्ट्र शासन व इतर.

**महोदय,**

जिल्हा परिषद संवर्गातील उप अभियंता पदावरील ७ अधिकाऱ्यांनी त्यांची नांवे जलसंपदा विभाग किंवा मृद व जलसंधारण विभागाच्या सेवाज्येष्ठता यादीमध्ये समाविष्ट झालेली नसल्याने मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथे विषयांकित अर्ज दाखल केलेला होता.

२. मृद व जलसंधारण विभागाच्या दिनांक ३१ मे, २०१७ च्या शासन निर्णयानुसार मृद व जलसंधारण विभाग नव्याने निर्माण करण्यात आलेला आहे. या शासन निर्णयामधील परिच्छेद-७-आ नुसार जिल्हा परिषद यांचेकडील एकूण २९५९ मंजूर पदे व या पदांमधील जलसंपदा विभागाकडील जिल्हा परिषद संवर्गातील कार्यकारी अभियंत्यांची ३१ पदे व उप अभियंत्यांची १८९ पदे मृद व जलसंधारण विभागाकडे कायमस्वरुपी समायोजित करण्यात आलेली आहेत. प्रस्तुत मूळ अर्जातील ७ उपअभियंता अर्जदार हे वरील १८९ पदांमध्ये समाविष्ट होते. मात्र सदर अधिकाऱ्यांनी उक्त शासन निर्णयातील परिच्छेद ८ नुसार मृद व जलसंधारण विभागामध्ये समायोजनाचा विकल्प दिलेला नसल्याने त्यांच्या सेवा मृद व जलसंधारण विभागाने त्या विभागाच्या आस्थापनेवर समायोजित करुन घेतलेल्या नाहीत.

तसेच अर्जदार उप अभियंते हे जिल्हा परिषद संवर्गातील ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या आस्थापनेवरील असल्याने शासन निर्णय दिनांक ३१ मे, २०१७ मधील परिच्छेद-७-आ नुसार त्यांचे नव्याने निर्मित मृद व जलसंधारण विभागाच्या आस्थापनेवर समावेशन झालेले आहे. त्यामुळे जलसंपदा विभागाने दि.९/३/२०१८ रोजी प्रसिध्द केलेल्या ज्येष्ठतासूचीमध्ये जिल्हा परिषद संवर्गातील उप अभियंत्यांच्या नावाचा समावेश करणे शक्य नाही, अशी या विभागाची भूमिका होती.

प्रस्तुत मुळ अर्जावरील दिनांक २५.०२.२०२० रोजीच्या सुनावणीच्या वेळी संबंधित उप अभियंत्यांच्या समावेशनाबाबतची दोन्ही विभागाच्या प्रतिनिधी योग्य ती वस्तुस्थिती मा. न्यायाधिकरणासमोर सादर करावी, असे मा. न्यायाधिकरणाने आदेशित केले होते.

३. प्रस्तुत पार्श्वभूमीवर या प्रकरणी शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने/अभिप्रायानुसार मृद व जलसंधारण विभागाच्या आस्थापनेवर समावेशनाचा विकल्प सादर न केलेल्या अर्जदार व इतर जिल्हा परिषद संवर्गातील उप अभियंत्यांच्या सेवा जलसंपदा विभागात सामावून घेण्यात येतील. असे विभागामार्फत मा. न्यायाधिकरणास अवगत करण्यात आले. सदर मुळ अर्जावर मा. न्यायाधिकरणाने दिनांक २५.०२.२०२० रोजी पुढीलप्रमाणे आदेश पारित केले आहेत.

> **“We direct the respondent No.2 enter the names of the applicants in the seniority list and fix their seniority after 15.07.2017 within three months from the date of this order”.**

मा. न्यायाधिकरणाच्या उक्त आदेशाच्या पार्श्वभूमीवर, जिल्हा परिषद संवर्गातील अर्जदार व इतर उप अभियंत्यांतील ज्या उप अभियंत्यांनी मृद व जलसंधारण विभागात समावेशनाचा विकल्प सादर केला नाही. परिणामी संबंधितांची नावे मृद व जलसंधारण तसेच जलसंपदा विभागातील उप अभियंता संवर्गाच्या सेवाज्येष्ठतेत समाविष्ट झालेली नाहीत. अशा अभियंत्यांचे जलसंपदा विभागात समावेशन करुन त्यांची नावे या विभागाच्या उप अभियंता संवर्गाच्या दिनांक ०१.०१.२०१८ स्थित तात्पुरत्या सेवा ज्येष्ठतासुचीमध्ये समाविष्ट करण्याच्या अनुषंगाने संबंधितांची नावे व आवश्यक सेवा तपशिल/माहिती न चुकता दिनांक १९ मार्च, २०२० पर्यंत शासनास उलटटपाली/मेलद्वारे सादर करावी.

उक्त दिनांकापर्यंत माहिती प्राप्त न झाल्यास ज्या उप अभियंत्यांची माहिती प्राप्त झालेली आहे. ती अंतिम गृहित धरुन प्रसिध्द करण्यात येईल.

सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००३१२१७४१२०६४२७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन पाठविण्यात येत आहे.

तसेच जलसंपदा विभागाच्या www.wrd.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

**आपला,**

Uddhav Rabhaji Dahiphale

Digitally signed by Uddhav Rabhaji Dahiphale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05b3ca49b9a0a924fd4d8743e6e254e742308f02108527986e098afc27201f30, serialNumber=2d80774c9ed65eca9be69006934bfb5c4ca32ab0dc1a2ec5746398458bdf1c37, cn=Uddhav Rabhaji Dahiphale
Date: 2020.03.12 17:45:07 +05'30'

**( उध्दव र. दहिफळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अप्पर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे
२. उप सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, उक्त अर्जावर तसेच मुळ जिल्हा परिषद संवर्गातील उप अभियंत्यांपैकी मृद व जलसंधारण तसेच जलसंपदा या दोन्ही विभागाच्या ज्येष्ठतासूचीत समावेश न झालेल्या उप अभियंत्यांची माहिती/सेवा तपशिल कृपया या विभागास त्वरित उपलब्ध करुन द्यावा.
३. कार्यासन आ.(वर्ग-२) संग्रहार्थ.